"केंद्र शासनाच्या कारागृह सुधारणा" या केंद्र पुरस्कृत (७५:२५) योजनेतर योजनेअंतर्गत २००३-२००४ च्या वर्षाकरिता निधी वितरण

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. बीजीटी २००४/प्र.क्र.५१/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-३२, दि. ३० मार्च, २००५

पहा :- १) शासन निर्णय , गृह विभाग क्र. एमआयएस २००२/प्र.क्र.१४७ /पीआरएस-२, दिनांक, २६ मार्च, २००३
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र. एमआयएस २००२/प्र.क्र.१४७/ पीआरएस-२, दिनांक, ११ जून, २००३
३) शासन पत्र, गृह विभाग क्र. एमआयएस २००४/प्र.क्र.१५/ पीआरएस-२, दिनांक, ५ मार्च, २००४
४) केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाचे पत्र क्र. व्ही-आयआय-११०१८/३१/ २००२-पीआर, दिनांक ७ मे, २००४
५) शासन निर्णय क्र.बीजीटी २००४/प्र.क्र.५१/पीआरएस-२, दि.१९ ऑगस्ट, २००४
६) शासन पत्र गृह विभाग क्र.आरईटी ०२०५/२०५६/२००४-२००५/बीयुडी-१, दि.१७ मार्च, २००५
७) वित्त विभाग,परिपत्रक क्रमांक पूरक -१०.०५/प्र.क्र.८/२००५ अर्थसंकल्प-३ दि.३० मार्च,२००५
८) गृह विभाग पत्र क्र.एसयूपी-११०५/पु.मा/अर्थसंकल्पीय अधिवेशन प्र.क्र.१५/बीयुडी-१, दि.३०.३.२००५

शासन निर्णय :- केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाने "कारागृह सुधारणा" ही योजनेतर योजना नव्याने २००२-०३ या वर्षापासून सुरु असल्याचे कळविले असून सदर योजनेसाठी सन २००२ ते २००७ या ५ वर्षाकरिता राज्यास १) नवीन कारागृहाचे बांधकाम, २) अस्तित्वात असलेल्या कारागृहांची दुरुस्ती व नुतनीकरण, ३) स्वच्छता व पाणीपुरवठा व ४) कारागृह कर्मचाऱ्यांची निवासस्थाने इत्यादी सन २००२-०७ या पाच वर्षाच्या कालावधीसाठी अंदाजित रु. १२९.१६ कोटींची योजना मंजूर केल्याचे कळविले असून त्यामध्ये राज्यशासनाचा हिस्सा म्हणून रु. ३२.२८ कोटी इतका आहे.

२. या योजनेच्या सन २००३-०४ च्या आराखड्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाने त्यांच्या दि.२९ मार्च, २००४ च्या पत्रान्वये केंद्र शासनाचा हिस्सा म्हणून रु.९,६८,६५,०००/- इतका निधी वितरीत केलेला आहे. सदरहू निधीच्या अनुषंगाने केंद्रिय हिस्साच्या प्रमाणात राज्य शासनाचा २५ टक्के हिस्सा म्हणून रु.३,२३,३५,०००/- मिळवून अशी एकूण रु.१२,९२,००,०००/- (रुपये बारा कोटी ब्याण्णव लाख फक्त) इतकी रक्कम सदर योजनेतील सन २००३-०४ मधील कामावर खर्च करण्यासाठी वितरीत करण्यास शासन या आदेशान्वये मंजूरी देत आहे.

D:\pramila\prs-2\2005\march\letter\23

कारागृह महानिरीक्षक यांनी काम निहाय सदर निधी नियंत्रण अधिका-यांमार्फत संबंधीत कार्यकारी अभियंता यांना तात्काळ वितरीत करावा व त्याबाबत काढलेल्या आदेशांची प्रत शासनास सादर करावी.

३. या योजनेच्या खर्चाचे तसेच विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र, तिमाही प्रगती अहवाल कारागृह महानिरीक्षक यांनी संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडून वेळीच प्राप्त करुन शासनास सादर करावा.

४. या योजनेतील बांधकाम व इतर बाबीसंबंधी कामे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून "ठेव अंशदान बांधकामे" (Deposit Contribution works) पध्दतीने करण्यात येते व याबाबतचे अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांमार्फत संबंधित कार्यकारी अभियंता यांना वितरीत करण्यात येईल. याबाबत होणारा खर्च मागणी क्र. बी-५ मुख्यलेखाशिर्ष "२०५६-तुरुंग, १०१- तुरुंग, केंद्रपुरस्कृत योजना, (००)(०९) कारागृह सुधारणा योजना (२०५६-०१८१) योजनेतर/ बांधकाम" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो सन २००४-०५ या वर्षी केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे अशा.पत्र.क्र.संकीर्ण-१००४/प्र.क्र.११/अर्थोपाय, दिनांक १४.१०.२००४, अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्तिनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

आ.ग.परदेशी

(आ. ग. परदेशी)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत,

- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
- सर्व कारागृह उपमहानिरीक्षक
- सर्व कारागृह अधिक्षक
- महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
- महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
- अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
- निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
- सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
- अवर सचिव, पोल-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- उप सचिव, इमारती-२, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
- श्री.बी.आर.कांबळे, उप अभियंता, कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- वित्त विभाग (व्यय-८) (अर्थसंकल्प-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती, पीआरएस-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

****

D:\pramila\prs-2\2005\march\letter\23